शासकीय विमान सेसना सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटी-व्हिडीडीच्या उड्डानाकरीता कंत्राटी पध्दतीने नेमण्यात आलेल्या एजन्सीकडून प्राप्त वैमानिक नियुक्ती करारास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.विचासं-१११९/प्र.क्र.१९/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक: २४ एप्रिल, २०२३.

**वाचा :**१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.डीसीए-२०१२/ प्र.क्र.२९४/ २८-अ, दि.१७/११/२०१७
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.डीसीए-२०१२/ प्र.क्र.२९४/ २८-अ, दि.१५/०२/२०१८
३) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१६०/ २८-अ, दि.१/१/२०१९ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.डीसीए-२०१२/ प्र.क्र.२९४/ २८-अ, दि.२२/२/२०१९
५) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१५१/ २८-अ, दि.१८/६/२०२० ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
६) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१६०/ २८-अ, दि.७/७/२०२१ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
७) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-११२२/ प्र.क्र.१०/ २८-अ, दि.२०/१/२०२२ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
८) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-११२२/ प्र.क्र.१०/ २८-अ, दि.१८/४/२०२२ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
९) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-११२२/ प्र.क्र.१६५/ २८-अ, दि.२/८/२०२२ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
१०) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-११२२/ प्र.क्र.१६५/ २८-अ, दि.२०/१०/२०२२ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
११) शासन पत्र दि.१३/०४/२०२३ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीची चक्राकार पध्दतीची मान्यता.

**प्रस्तावना :**

राज्यातील अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाची जबाबदारी राज्य शासनाच्या अधिनस्त विमानचालन संचालनालयाद्वारे पार पाडली जाते. दिनांक

१७/११/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय विमान सेसना सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटी-व्हिडीडी हे विमान कार्यरत ठेवण्याकरीता ई-निविदा पध्दतीचा अवलंब करुन मे.ॲरो एअरक्राफ्ट सेल्स ॲड चार्टर्ड प्रा.लि. यांची निवड करण्यात आली होती. सदर कंपनीला कंत्राट दिल्यानंतर शासनाच्या विमानाकरीता बाहययंत्रणेद्वारे वैमानिकांची नियुक्तीस संदर्भ क्र.३ ते १० च्या शक्ती प्रदत्त समितीच्या घेतलेल्या निर्णयानुसार दि.३१.०३.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता सदर करार संपुष्टात आल्यामुळे सदर करारास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

संदर्भ क्र.११ नुसार शासन पत्र दि.१३.०४.२०२३ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीने शासनाच्या मालकीचे विमान सेसना सायटेशन ५६० एक्स एस एल व्हीटी-व्हीडीडीकरीता बाह्ययंत्रणेद्वारे वैमानिक नियुक्ती करारास जुन्या अटी व शर्तीच्या अधिन सहा महिन्याची म्हणजेच दि.३०.०९.२०२३ पर्यंत किंवा निविदा प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यास चकाकार पध्दतीने मान्यता देण्यात आली. यानिर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे .

**<u>शासन निर्णय :</u>**

शासनाच्या मालकीचे विमान सेसना सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटी-व्हीडीडी याकरीता विमानचालन व्यवस्थापन सेवा पुरविण्याकरीता मे.ॲरो एअरक्राफ्ट सेल्स ॲन्ड चार्टड प्रा.लि. नवी दिल्ली यांच्या बाहययंत्रणेद्वारे वैमानिकांच्या नियुक्ती करारास जुन्या अटी व शर्तीच्या अधीन पुढील सहा महिने म्हणजेच दि.३०.०९.२०२३ पर्यंत किंवा निविदा प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अनुमती देण्यात येत आहे. तसेच निविदा प्रक्रिया लवकरात लवकर पूर्ण करण्यात यावी. या कंपनीसोबत राज्य शासनाच्या वतीने करारनामे करण्याचे अधिकार राज्य शासनाच्या वतीने संचालक, विमानचालन संचालनालय यांना प्रदान करण्यात येत आहेत.

३. या बाबतचा होणारा खर्च मागणी क्र.ए-४, “२०७०-इतर प्रशासकीय सेवा (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (अनिवार्य) २०७० ०१५६” या लेखाशिर्षातंर्गत **५०-इतर खर्च** या उद्दिष्टाखाली संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्प तरतूदीतून भागविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. या प्रित्यर्थ उप संचालक, विमानचालन, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरहू आदेश विमानचालन संचालनालयाच्या विविध बाबींवर निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली कार्यरत असलेल्या शक्ती प्रदत्त समितीने चक्राकार पध्दतीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०४२६१५३४२४८५०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2023.04.26 15:40:45 +05'30'

**(म.कि. वाव्हळ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
२) उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
३) महालेखापाल ,(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र राज्यमुंबई ,
४) महालेखापाल लेखा)परीक्षा ,(महाराष्ट्र राज्यमुंबई ,
५)अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (का-२८अ)